विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या सन २०२०.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन आदेश क्र. मुविनि-२०२०/प्र.क्र.११४/ऊर्जा-५**
**मंत्रालय, मुंबई.**
**दिनांक:- १० ऑगस्ट, २०२०**

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४ (१), ४(२) व ४ (३) मधील तरतुदीनुसार विद्युत निरीक्षणालय शाखेतील विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्याची प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. राजीव वा. महालक्ष्मे, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अकोला | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, परभणी (रिक्तपदी) |

२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्यांच्या बदलीच्या ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना बदलीच्या ठिकाणी जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. तसेच बदली झालेल्या अधिकाऱ्यास रजा मंजूर करु नये.

३. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेली बदली रद्द करणे किंवा त्यात बदल करणे यासाठी राजकीय दडपण/ दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित विद्युत निरीक्षक यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात येईल.

४. संबंधित विद्युत निरीक्षक यांनी नियुक्तीच्या नवीन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१११८२५४६७४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.08.11 18:31:40 +05'30'

**(प्र. पु. बडगेरी)**

**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू.), मुंबई-७१
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महराष्ट्र, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला/ परभणी
५. उपसचिव (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. संबंधित श्री. राजीव वा. महालक्ष्मे, विद्युत निरीक्षक (मुख्य विद्युत निरीक्षक यांच्यामार्फत)
७. निवड नस्ती (ऊर्जा-५)

**प्रतः-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहाय्यक , मंत्रालय, मुंबई-४०००३२.